शैक्षणिक वर्ष २००९-१०
अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात
बी.एम.एम. (मराठी माध्यम) या नवीन अभ्यासक्रमास
मान्यता

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
शासन आदेश क्रमांक एनजीसी २००९/(१०६/०९)/मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९

पहा:-१) शासन आदेश क्रमांक एनजीसी २००९/(१०६/०९)/मशि-४, दिनांक २५ जून, २००९
२) मुंबई विद्यापीठ, मुंबई यांचे पत्र क्र. संलग्नता/ मान्यता-२/३४१२/२००९, दिनांक २८ जुलै, २००९

## शासन आदेश

मुंबई विद्यापीठाअंतर्गत बी.एम.एम. (Bachelor of Mass Media) हा अभ्यासक्रम मराठी माध्यमामध्ये कायम विना अनुदान तत्वावर सुरु करण्यास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार संदर्भ क्र. २ अन्वये मुंबई विद्यापीठाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांपैकी खालील संस्थांना / महाविद्यालयांना महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२(५) व ८३(५) अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार खालील अटी व शर्ती च्या अधिन राहून शैक्षणिक वर्ष २००९-१० पासून बी.एम.एम. (Bachelor of Mass Media) हा अभ्यासक्रम मराठी माध्यमामध्ये कायम विना अनुदान तत्वावर सुरु करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | महाविद्यालयाचे नांव |
|---|---|
| १ | पार्ले टिळक विद्यालय असोशियनचे साठ्ये कॉलेज, दिक्षित रोड, विलेपार्ले (पुर्व), मुंबई ४०० ०५७ |
| २ | एस. के. सोमय्या कला , विज्ञान आणि वाणिज्य महाविद्यालय, विद्यानगर, विद्याविहार, मुंबई ४०० ०७७ |
| ३ | विद्या प्रसारक मंडळाचे के. जी. जोशी कला महाविद्यालय आणि एन.जी. बेडेकर वाणिज्य महाविद्यालय, चिक लँड, चेंदाणी बंदर रोड, ठाणे ६०० ६०१. |
| ४ | बिर्ला कला, विज्ञान आणि वाणिज्य महाविद्यालय, बिर्ला कॉलेज रोड, कल्याण ४२१ ३०४ |
| ५ | सुधागड एज्युकेशन सोसायटीचे, शिक्षण महर्षी दादासाहेब लिमये कला, वाणिज्य, विज्ञान आणि कॉम्प्युटर सायन्स महाविद्यालय, सेक्टर १ ई /३ ई. सिडको कॉलनी, कळंबोली, नवी मुंबई ४१० २१८. |
| ६ | शिक्षण प्रसारक मंडळाचे रामनारायण रुईया महाविद्यालय, माटुंगा, मुंबई ४०० ०१९ |
| ७ | लेट विष्णू वामन ठाकूर चॅरिटेबल ट्रस्टचे कला, वाणिज्य आणि विज्ञान महाविद्यालय, राम मंदिर रोड, एम. बी. इस्टेट, विरार (प.), ठाणे ४०१ ३०३. |

**अटी व शर्ती:-**

१) नवीन अभ्यासक्रम मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयांने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.

२) संबंधित विभागीय सहसंचालकांचे हमीपत्र सादर केल्याविषयीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठांने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

३) विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार महाविद्यालयांनी, अध्यापक वर्ग/ कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकानी करावी व तद्नंतरच उपरोक्त अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

४) महाविद्यालयांने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

५) नवीन अभ्यासक्रम/विषय मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयांनी सन २००९-१० व २०१०-११ मध्ये NAAC ॲक्रीडीएशन प्राप्त करुन घ्यावे.

६) महाराष्ट्र विद्यापीठ कायदा १९९४ मधील कलम ८२ (५) व ८३(५) नुसार ही मान्यता शैक्षणिक वर्ष २००९-१० पासून देण्यात येत आहे.

२. विद्यापीठाचे संलग्निकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही विद्यापीठानी करण्यापूर्वी शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन केल्याशिवाय व विभागीय सहसंचालकाचे प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई यांना पाठवावा.

३. विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांनी नवीन अभ्यासक्रमाबाबतचा नियतकालिक आढावा घेवून जर अभ्यासक्रमा मध्ये मंजूर विद्यार्थी संख्येच्या ५० टक्के किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर अभ्यासक्रम/विषयांची रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत.

४. हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८३११४३०१९००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

३१।८।०९

( वि. गो. चांदेकर )
कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन

प्रत,

१) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई
४) संबंधित संस्था,
५) निवड नस्ती (मशि-४)